परभणी जिल्हयातील पूर्णा शहरात दि.१४.०४.२०१७ रोजी झालेल्या दंगलीमध्ये बाधित व्यक्तींच्या कुटूंबियांना आर्थिक मदत देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक :- आरएलएफ-२०१९/प्र.क्र.३/म-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ३१ जानेवारी २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- आरएलएफ-११.०३/प्र.क्र.३१०/म-३, दि.२४.०८.२००४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक:- आरएलएफ-१२.०८/प्र.क्र.२९८/म-३, दि.०१.१२.२००८
३) जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र.२०१८/पोल-२/गृह/कावी/३९८, दि.१२.०६.२०१९

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दहशतवादग्रस्त व दंगलग्रस्त आपदग्रस्तांना मदत देऊन त्यांचे पुनर्वसन करण्याबाबतची योजना अंमलात आणण्यात आली आहे. या घटनांमध्ये बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांना द्यावयाच्या मदतीचे दर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सुधारित करण्यात आले असून यामध्ये दहशतवादी घटना व दंगलीतील मृत व्यक्तींच्या वारसांना/कुटूंबियांना द्यावयाच्या मदतीच्या रकमेत प्रती व्यक्ती रू.१,००,००० ऐवजी रू. ५,००,००० वाढ करण्यात आली आहे.

त्यानुसार जिल्हाधिकारी, परभणी यांनी पूर्णा शहरात डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२६ व्या जयंतीच्या मिरवणूकीमध्ये झालेल्या दंगलीमध्ये मृत व्यक्तीस मदत करण्याबाबतचा संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याप्रकरणी सर्व बाबी विचारात घेऊन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

परभणी जिल्हयातील पूर्णा शहरात दि.१४.०४.२०१७ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२६ व्या जयंतीनिमित्त निघालेल्या मिरवणूकीमध्ये दोन समाजामध्ये झालेल्या बाचाबाचीचे पर्यावसन दंगलीमध्ये होऊन त्यामध्ये झालेल्या दगडफेकीत श्री.सोनाजी किशन हनवते, रा.नेहरू नगर, पूर्णा यांना मार लागून त्यांचा उपचारा दरम्यान मृत्यू झाला आहे. सबब संदर्भाधीन क्र.१ व २ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार दंगलीमध्ये मृत झालेल्या श्री. सोनाजी किशन हनवते यांच्या वारसांना रू.५.०० लक्ष (रूपये पाच लक्ष फक्त) एवढी मदत अदा करण्यास याव्दारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील मृत व्यक्तिंच्या वारसदारांना अदा करावयाची रक्कम संबंधित विभागीय आयुक्तांमार्फत उपलब्ध करून देण्यात येत आहे.

३. याबाबतचा खर्च, "मागणी क्र.सी-५, सामाजिक सुरक्षा व कल्याण-६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम-२००-इतर कार्यक्रम २००(०१(०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहचलेल्या व्यक्तिंना सहाय्य ( २२३५ ०३४७) " या मुख्य लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर प्रकरणी खर्चाचे पत्रक विहित कालमर्यादेत न चुकता महसूल व वन विभागास प्राप्त होईल याची संबंधित विभागीय आयुक्त तसेच जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच प्रचलित नियमानुसार मदतीचे वाटप करण्यात यावे.

५. नियंत्रक अधिकारी यांना असेही कळविण्यात येते की, सदर मदतीची रक्कम विनाविलंब वितरीत करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही यांची दक्षता घ्यावी. अनुदान वाटपासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ पाठविण्यात यावे. याबाबतचा खर्चाचा मेळ महालेखापाल यांनी नोंदविलेल्या खर्चाशी घेण्यात यावा व महालेखापालाच्या ताळमेळ प्रमाणपत्रासह विनियोजन लेखे शासनाकडे तात्काळ पाठवावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००२०११२२७५२८८१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3da afe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308 b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.02.01 12:06:59 +05'30'

**(सु. ह. उमराणीकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त औरंगाबाद
२)जिल्हाधिकारी, परभणी
३) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
६) संचालक लेखा व कोषागरे, संगणक शाखा, मुंबई,
७) कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प-१/म-११/पीएसी/पीएसी-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परभणी,
९) निवडनस्ती (म-३ कार्यासन)